सन २०१४-१५ या वित्तीय वर्षातील मंजूर योजनेतर तरतूदीमधून बंदी कल्याण, कुटुंब कल्याण व क्रिडा निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.१९४/तुरुंग-२

मुख्य इमारत, दुसरा मजला, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ००५.
दिनांक: ३१ मार्च, २०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. जेएलएम-१३१४/प्र.क्र.१९४/तुरुंग-२, दि.२९.०१.२०१५
२) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, पुणे यांचे पत्र क्र.लेखा/स्वेच्छा निधी/२९९२, दिनांक २३.०३.२०१५.

**शासन निर्णय**

राज्यातील कारागृह विभागाकरिता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये बंदी कल्याण, कुटुंब कल्याण व क्रिडा निधी या योजनेतर योजनेसाठी मागणी क्र. बी-५, २०५६ तुरुंग (योजनेतर), ००१, संचालन व प्रशासन (००) (०१) कारागृह महानिरीक्षणालय, ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२०५६ ००२६) या लेखाशीर्षाखाली रु.९०,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. वरील तरतूदीमधून वरील वाचा-१ येथील शासन निर्णयान्वये रुपये ५४,०००/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दर्शविण्यात आली आहे. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात अर्थसंकल्पीत रुपये ९०,०००/- इतक्या रकमेपैकी अवितरीत रुपये ३६,०००/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या वरील वाचा-२ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सबब, अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी विनंती केल्याप्रमाणे सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये बंदी कल्याण, कुटुंब कल्याण व क्रिडा निधी याकरिता रुपये ३६,०००/- आहरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी आहरित व संवितरीत करण्यास अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र. बी-५, २०५६ तुरुंग (योजनेतर), ००१, संचालन व प्रशासन, (००) (०१) कारागृह महानिरीक्षणालय (२०५६ ००२६), ३१-

सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) दत्तमत या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २००/१५/व्यय-८, दिनांक-२७.०३.२०१५ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११६१३१३४२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.31 20:08:59 +05'30'

(र. ई. गिरी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- कक्ष अधिकारी (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग,मंत्रालय, मुंबई -४०० ००५,
- निवड नस्ती (तुरुंग-२).